**महाराष्ट्र शासन**

**तात्काळ/महत्त्वाचे/प्रशिक्षण**
**(दिनांक २३.१०.२०१८)**
**सकाळी ९.४५ ते ५.०० (तुकडीनुसार)**

संकीर्ण-१४१८/प्र.क्र.१७८/का.१४
सामान्य प्रशासन विभाग
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :-२२.१०.२०१८

**प्रति,**
सह/उप सचिव (आस्थापना)
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई.

**विषय** :- हृदयविकारी व्यक्तीस जीवसंजीवनी क्रिया (Compression Only Life Support ) देणेबाबत प्रशिक्षण

**संदर्भ** :- मा.मंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटूंबकल्याण यांचे दि.१६.१०.२०१८ चे पत्र.

**महोदय,**

हृदयविकाराचा झटका आलेल्या व्यक्तीला लगेच जीवसंजिवनी क्रिया म्हणजेच Compression Only Life Support (COLS) मिळाल्यास त्या व्यक्तीचे प्राण वाचण्याची शक्यता वाढते. सार्वजनिक आरोग्य विभागाच्या सहकार्याने महाराष्ट्रात भूलतज्ञ संघटनेमार्फत संपूर्ण राज्यात हृदयविकाराबाबत जनजागृती तसेच प्रशिक्षण मोहिम राबविण्यात येत आहे. त्याचाच भाग म्हणून मंत्रालयातील अधिकारी/कर्मचारी यांना याबाबत प्रशिक्षण दि.२३.१०.२०१८ रोजी सकाळी ९.४५ ते सायंकाळी ५.०० या कालावधीत मंत्रालय, मुख्य इमारत, तळ मजला. त्रिमूर्ती समोरील आच्छादीत पटांगण (कॅफेटेरिया) येथे आयोजित करण्यात आले आहे. सदर कार्यक्रमाचे उद्घाटन मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांच्या हस्ते होणार आहे.

मंत्रालयातील सुमारे २५०० ते ३००० अधिकारी/कर्मचारी यांना प्रशिक्षण देण्यात येणार आहे. सदर प्रशिक्षणासाठी १०० अधिकारी/कर्मचारी यांची एक तुकडी (बॅच) करण्यात येणार आहे. प्रशिक्षणामध्ये २० मिनिटाचे सादरीकरण व ०१ मिनिटाचे हँड्सऑन प्रात्यक्षिक देण्यात येणार आहे. तरी सदर प्रशिक्षणासाठी आपल्या विभागातील अधिकारी/कर्मचारी यांना सहभागी होण्यासाठी अवगत करावे. प्रशिक्षण तुकडीमध्ये देण्यात येणार असून त्यासाठी जास्तीत जास्त सहभाग होण्याच्यादृष्टीने सर्व अधिकारी/कर्मचारी यांना उपस्थितीबाबत सूचीत करावे, ही विनंती.

सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८१०२२१६५९४९७६०७ असा आहे. हे पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.10.22 17:03:09 +05'30'

( ग.भि.गुरव )
अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग

**प्रत,**

१ मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव

२ सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव.

३ अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

४ सह सचिव, मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे कार्यालय.

५ खाजगी सचिव, मा.मंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटूंब कल्याण.

६. कार्यासन-१४/निवडनस्ती.